**श्री. ए. पी. मदनकर, सेवानिवृत्त कर्मचारी, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नागभिड, जि. चंद्रपूर यांना अतिप्रदान झालेली रक्कम वसुल न करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शासन निर्णय क्रमांक : व्यशिअ-२०२५/प्र.क्र.४३/व्यशि-१**

**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**

दुसरा मजला, मुख्य इमारत, मंत्रालय, मुंबई.३२-

**दिनांक: २५ मार्च, २०२५**

**संदर्भ :-** (१) मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिरण, खंडपीठ नागपूर यांचे दि. ०८/०१/२०२० रोजीचे आदेश

(२) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र: व्यशिप्र-२०२३/आस्था-४/प्र. क्र. १/लो. आयुप्र/मदनकर/का. ४/२६, दि. १/३/२०२४

(३) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. ०६/तक्रार/२०२१/६१, दिनांक ०३/०१/२०२५

**प्रस्तावना:-**

श्री. ए. पी. मदनकर, सेवानिवृत्त चतुर्थश्रेणी कर्मचारी, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नागभिड, जि. चंद्रपूर हे दि. ३०/०६/२०१८ रोजी नियतवयोमानानुसार सेवानिवृत्त झाले आहेत. श्री. मदनकर यांचे निवृत्तीवेतन नंतरचे लाभ अदा करण्याच्या कार्यवाहीकरिता त्यांचे सेवापुस्तक वेतन पडताळणी पथक, नागपूर यांच्याकडे दि.२०/१२/२०१७ रोजी पाठविले असता वेतन पडताळणी पथकाकडून कालबध्द पदोन्नतीतील लाभ दि.०१/०१/१९९७ वर आक्षेप नोंदविण्यात आला. याबाबत औ.प्र.संस्था, नागभिड यांनी सदर आक्षेपाची पूर्तता करण्यास्तव पुन्हा वेतन निश्चिती केली असता श्री. मदनकर यांना रु.१,९१,४१४/- (रुपये एक लाख एक्याण्णव हजार चारशे चौदा फक्त) चे अतिप्रदान झाल्याचे निदर्शनास आले. सदर अतिप्रदान झालेल्या रकमेच्या वसुलीबावत श्री. मदनकर यांना औ.प्र.संस्था, नागभिड यांचेमार्फत कळविले असता त्यांनी त्यांच्या दि. ०५/०७/२०१८ रोजीच्या पत्रान्वये अतिप्रदानाच्या रकमेची वसुली मृत्यू-नि-सेवा उपदान (डी.सी.आर.जी.) या रकमेमधुन करण्याची सहमती दर्शविली.

परंतु, श्री. मदनकर यांनी अतिप्रदान झालेले रुपये १,९१,४१४/- (रुपये एक लाख एक्याण्णव हजार चारशे चौदा फक्त) चे वसुली आदेश रद्द करण्यास्तव मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर येथे मूळ अर्ज क्र. ७८१/२०१८ अन्वये याचिका दाखल केली. त्याअन्वये मा. न्यायाधिकरण यांनी दि. ०८/०१/२०२० रोजी अंतिम आदेश पारीत करुन याचिका निकाली काढली. अंतिम आदेशाप्रमाणे श्री. मदनकर यांना अतिप्रदान झालेल्या रकमेची वसूली मृत्यू-नि-सेवा उपदान (डी.सी.आर.जी.) या रक्कमे मधून न करण्याबाबतचा आदेश दिला. त्यानुसार सदर आदेश रद्द करण्याची नोंद श्री. मदनकर यांच्या सेवा पुस्तकात घेण्यात आली. तथापि, सेवा पुस्तक पुन:श्च पडताळणीस सादर केले असता अतिप्रदानाची रक्कम रु. १,९१,४१४/- (रुपये एक लाख एक्याण्णव हजार चारशे चौदा फक्त) वसूली न करण्याबाबत शासन निर्णय जोडण्याचा आक्षेप घेतला आहे. त्यास

अनुसरुन संचालनालयाने संदर्भ क्र. (३) येथील दि. ०१/०३/२०२४ रोजीच्या पत्रान्वये श्री. ए. पी. मदनकर यांची मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर यांनी रु. १,९१,४१४/- (रुपये एक लाख एक्याण्णव हजार चारशे चौदा फक्त) ची वसुली करण्यात येऊ नये याबाबत दिलेल्या आदेशास शासनाची मंजूरी देण्यात यावी व तसा शासन निर्णय निर्गमित करण्याची विनंती केली आहे. यानुषंगाने श्री. मदनकर यांच्या प्रकरणी शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

श्री. ए. पी. मदनकर, सेवानिवृत्त चतुर्थश्रेणी कर्मचारी, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नागभिड, जि. चंद्रपूर यांच्या सेवापुस्तकात वेतन पडताळणी पथकाकडून कालबध्द पदोन्नतीतील लाभ दि.०१/०१/१९९७ वर आक्षेप नोंदविण्यात आला आहे. त्यानुसार त्यांना रु.१,९१,४१४/- (रुपये एक लाख एकाण्णव हजार चारशे चौदा फक्त) चे अतिप्रदान झाल्याचे निदर्शनास आले आहे. याप्रकरणी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर यांनी दिलेल्या आदेशास अनुसरुन श्री. ए. पी. मदनकर यांना झालेल्या अतिप्रदानाच्या रकमेची वसुली त्यांच्या मृत्यू-नि-सेवा उपदान (डी.सी.आर.जी.) या रकमेमधून करण्याचा आदेश या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, वित्त विभाग यांचे अनौपचारिक संदर्भ क्र. १६७, दि. ११/०२/२०२५ च्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२५१८०१४१६९०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VINOD VISHWANATH CHAUDHARI

Digitally signed by VINOD VISHWANATH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILLS EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT, 2.5.4.20=d3a61cf46d54b669ba9f5d9ba4f32dd8ed54a7ea64e7d1483ae325db5b8a3005, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8933E15B4DBF1243939DE4EFCC94AD1431E1DE56B3F2F32F01837980F363FA8D, cn=VINOD VISHWANATH CHAUDHARI
Date: 2025.03.25 18:02:31 +05'30'

**(विनोद वि. चौधरी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महारष्ट्र राज्य, मुंबई
२. सह संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, नागपूर
३. महालेखापाल, महाराष्ट्र -२, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), ½, महाराष्ट्र, मुंबई
४. संबंधित कोषागार अधिकारी/उप कोषागार अधिकारी
५. संबंधित कर्मचारी
६. निवडनस्ती (व्यशि-१)